**राज्यातील कृषिपंप ग्राहकांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (समायोजनाने) सन २०२४-२५.(लेखाशिर्ष -२८०१५५७२)(रु.१७०६.२२ कोटी)**

**महाराष्ट्र शासन**
**ऊद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधीवी-२०२४/प्र.क.५५/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- १८जुन, २०२४

**संदर्भ** :-

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३,दि.०१/०४/२०२४.

२) महावितरण कंपनीचे पत्र क्र.मु. अ.(वा)/शासन/मागणी/सवलत(GEN)/१०१४७,दि. ०१ एप्रिल,२०२४.

**प्रस्तावना** :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार विद्युत वितरण कंपनीला वीज दरात सवलत देण्यात येते व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून वितरण कंपनीस केली जाते. वितरण कंपन्यांना कृषिपंप ग्राहकांना वीज सवलतीसाठी सन २०२४-२५ करिता लेखाशिर्ष २८०१५५७२ खाली रु.५६८५.०० कोटी इतकी अर्थसंकल्पिय तरतूद करण्यात आली आहे.

सदर तरतूदीपैकी वित्त विभागाच्या संदर्भिय परिपत्रक निर्णय क्र. १ मधील सुचनांच्या अनुषंगाने व वित्त विभागाने अनुमती दिल्यानुसार रक्कम रु.१७०६.२२ कोटी इतका निधी महावितरणला समायोजनाने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषिपंप ग्राहकांना वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी सन २०२४-२५ करिता अर्थसंकल्पित केलेल्या रु. ५६८५ कोटी रक्कमेपैकी **रु.१७०६.२२ कोटी (रुपये एक हजार सातशे सहा कोटी बावीस लाख फक्त)** रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. उक्त प्रयोजनासाठी होणारा “मागणीक्रमांक के-६, २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, १०४, वीज विकास व्यवस्था राष्ट्रीय भार, (०१) वीज दरात सवलत, (०१) (०१) कृषीपंप ग्राहकांना वीजदर सवलत (सर्वसाधारण) (२८०१५५७२), (कार्यक्रम) ३३ अर्थसहाय्य” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२४-२५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाने वितरीत करावयाची रक्कम **रु.१७०६.२२ कोटी (रुपये एक हजार सातशे सहा कोटी बावीस लाख फक्त)** महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनी मर्या., यांच्याकडून शासनास येणे असलेल्या रक्कमेपोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १) | वित्तीय वर्ष २०२३-२४ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (एप्रिल,२०२३ ते मार्च,२०२४) (४७५,२२,००,०००-४७५,२२,००,०००=०० बाकी) | ४७५,२२,००,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्री यावरील कर (०१) (०२) मुंबई वीज विक्री कर अधिनियम १९६३ खालील जमा रक्कमा (००४३००२९) |
| २) | वित्तीय वर्ष २०२३-२४ या वर्षातील विद्युत शुल्कापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम (एप्रिल,२०२३ ते मार्च,२०२४) (२२३२,००,००,०००-१२३१,००,००,०००= १००१,००,००,००० बाकी) | १२३१,००,००,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्री यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (००४३००९२) |
| | **एकूण** | **१७०६,२२,००,०००/-** | |

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम **रु.१७०६.२२ कोटी (रुपये एक हजार सातशे सहा कोटी बावीस लाख फक्त)** चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

५. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल, मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने **निरंक रकमेचे** देयक तयार करण्यात यावे.

६. शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/ प्र.क्र.३४/ अर्थ-३, दि.०१/०४/२०२४ च्या परिपत्रकातील सोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील अटीची पूर्तता होत आहे. तसेच अनुक्रमांक १ ते ८ मधील अटीं लागू होत नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

७. या लेखाशिर्षाखाली निधी वितरित करण्यासाठी सादर करण्यात आलेल्या देयकाच्या अनुषंगाने प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक क्र.१६६/२०२४/व्यय-१६,दि.०५/०६/२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार सदर निधी समायोजनाने वितरित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०६१८१५२५४६१६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DR. GAURI RAKESH PATIL

Digitally signed by DR. GAURI RAKESH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=1fb6342b2e518b7b62c5e76771a2798f4bed2e746f3e27ba3a43ef40e20d8979, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B8FA6FD8474E1D5982D81B6510A6CD24CC422976DC8735D4C6A4C5193414E344, cn=DR. GAURI RAKESH PATIL
Date: 2024.06.18 15:41:55 +05'30'

(डॉ.गौरी पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री (ऊर्जा) ,यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.

४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
७) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१२) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१४) महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१६) अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
१७) अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१८) उप सचिव,(अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१९) कक्ष अधिकारी (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२०) निवड नस्ती (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.